शैक्षणिक वर्ष २०२३-२४
नवीन महाविद्यालयास इरादापत्र देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांकः न्यायाप्र-२०२२/प्र.क्र.१७५/मशि-४**
मंत्रालय विस्तार भवन,
मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २२ मे, २०२३.

संदर्भ - १. शासन निर्णय क्र. एनजीसी-२०१७/(२९/१७)/मशि-४, दि. १५.०९.२०१७.
२. मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ मुंबई यांचे याचिका क्र. ११८३२/२०२२ मधील दि. ०६.१२.२०२२ चे आदेश.

## शासन आदेश

भिगवण शिक्षण प्रसारक मंडळाचे लोकनेते राजेंद्रकुमार घोलप कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, भिगवण, ता. इंदापूर, जि. पुणे या नवीन महाविद्यालयास शैक्षणिक वर्ष २०२२-२३ मध्ये इरादापत्र नामंजूर केल्यामुळे मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ मुंबई येथे याचिका क्र. ११८३२/२०२२ दाखल केलेली आहे. प्रस्तुत प्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ मुंबई येथे दिनांक ०६.१२.२०२२ रोजी सुनावणी झाली असता मा. न्यायालयाने खालीलप्रमाणे आदेश दिलेले आहेत.

The State Government must had regard to an undertaking furnished by the petitioner of providing NAAC accreditation certificate within a period of one year as the petitioner has already started the process of getting NAAC accreditation/evaluation. We direct the State Government to communicate its decision in any case by 15/02/2023 to the petitioner as LOI will be made operational if so granted from next academic year 2023-24.

It is hereby clarified that the State Government shall not reject the proposal of the petitioner on the ground of want of NAAC accreditation certificate.

मा. उच्च न्यायालयाने उपरोक्त आदेशात याचिकादार संस्थेच्या नवीन महाविद्यालयास शैक्षणिक वर्ष २०२३-२४ करीता इरादापत्र मंजूर करण्याबाबत आदेशित केले आहे. मा. उच्च न्यायालयाने दिनांक ०६.१२.२०२२ रोजी दिलेल्या आदेशाच्या अनुषंगाने याचिकादार संस्थेच्या नवीन महाविद्यालयास खालील विवरणपत्रात नमूद केल्याप्रमाणे महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०९ (३) (घ) मधील तरतुदीनुसार शैक्षणिक वर्ष २०२३-२०२४ पासून खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासनाच्या कायम विनाअनुदान तत्वावरील या प्रचलित धोरणानुसार इरादापत्र देण्यात येत आहे.

| | **सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे** | |
|---|---|---|
| **अ.क्र.** | **संस्थेचे व महाविद्यालयाचे नाव** | **विद्याशाखा** |
| १. | भिगवण शिक्षण प्रसारक मंडळाचे लोकनेते राजेंद्रकुमार घोलप कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, भिगवण, ता. इंदापूर, जि. पुणे | कला, वाणिज्य व विज्ञान |

२. **अटी व शर्ती :-**

१. शासनाच्या प्रचलित धोरणानुसार नवीन महाविद्यालय सुरु करण्यासाठी देण्यात येणारे इरादापत्र हे **कायम विनाअनुदानित तत्वावर** महाविद्यालय सुरु करण्यासाठी राहील.

२. सदर इरादापत्र हे संस्थेने नवीन महाविद्यालयास अंतिम मान्यता प्राप्त करण्यापूर्वी विहित अटी व शर्तींची पूर्तता करण्याच्या दृष्टिने दिलेले असल्याने, या इरादापत्रामुळे संस्थेस नवीन महाविद्यालय सुरु करण्यास शासनाची अंतिम मान्यता प्राप्त झाल्याशिवाय महाविद्यालय सुरु करता येणार नाही.

३. शासनाकडून नवीन महाविद्यालय सुरु करण्याकरीता देण्यात आलेले इरादापत्र दिनांक **३१ जानेवारी २०२४ पर्यंत** वैध असेल. या कालावधीमध्ये ज्या अटी व शर्तींच्या आधारे इरादापत्र देण्यात आलेले आहे, त्या अटी व शर्तींची पूर्तता करुन त्याबाबतचा अनुपालन अहवाल अंतिम मान्यता मिळण्याकरीता आवश्यक असलेल्या कागदपत्रासह विद्यापीठास सादर करणे अनिवार्य राहील.

महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियमातील तरतूद लक्षात घेता, शासन निर्णय दि. १५ सप्टेंबर,२०१७ अन्वये अंतिम मान्यतेची कार्यपध्दती स्पष्टपणे विशद करण्यात आलेली आहे. अधिनियमातील तरतूदीनूसार व सदर कार्यपद्धतीनुसार इरादापत्र प्राप्त संस्था इरादापत्राच्या अटी व शर्ती पूर्ण करतात त्यांनी विद्यापीठाकडे अंतिम मान्यतेसाठी सर्व कागदपत्रासह अर्ज करावा व विद्यापीठांनी सर्व पात्र अर्जदार संस्थेचे अर्ज व त्यासोबतचा अनुपालन अहवाल मंजुरीच्या शिफारशीसह परिशिष्ट “क” व प्रपत्र “ब” व त्यासोबतच्या कागदपत्रासह शासनाकडे सादर करावा.

४. नवीन महाविद्यालय सुरु करण्यासाठी अंतिम मान्यता मागणाऱ्या इच्छूक संस्थेने इरादापत्रातील अटी व शर्तींची पूर्तता केली असल्याचा अनुपालन अहवाल संबधित विद्यापीठाकडे दाखल करावा. त्यासोबत परिशिष्ट “क” मध्ये नमूद केलेली कागदपत्रे जोडण्यात यावीत.

५. महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम २०१६ मधील कलम १०९ (३) (च) अंतर्गत परंतुकामध्ये नमूद केल्याप्रमाणे खंड (ङ) मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या कालमर्यादेत, जर व्यवस्थापन इरादापत्रातील शर्तींचे अनुपालन करण्यात कसूर करेल तर, इरादापत्र व्यपगत झाल्याचे समजण्यात येईल.

६. सदर महाविद्यालयास अंतिम मान्यता प्राप्त झाल्याशिवाय संबंधित विद्यापीठाने संलग्नतेची प्रक्रिया सुरु करु नये.

७. सदर महाविद्यालयास वरील विवरणात नमूद अभ्यासक्रमाचे महाविद्यालय सुरु करण्यास इरादापत्र हे संबधित विद्यापीठातील अधिकृत अभ्यासक्रम असल्याच्या धारणेतून देण्यात येत आहे. विद्यापीठाने याबाबत खातरजमा करावी.

८. महाविद्यालयाने कोणत्याही परिस्थितीत इरादापत्राच्या आधारे विद्यार्थ्यांना प्रवेश देऊ नयेत. अशा प्रकारे प्रवेश दिल्याचे निदर्शनास आल्यास या संदर्भातील कायद्यातील तरतुदीनुसार कारवाई करण्यात येईल व इरादापत्र रद्द करण्यात येईल.

९. महाविद्यालयामध्ये सोयी-सुविधा उपलब्ध करताना The Rights of Persons with Disabilities Act, २०१६ मधील तरतुदीनुसार तसेच या संदर्भातील वेळोवेळी विहित केलेल्या निकषानुसार दिव्यांग विद्यार्थ्यांकरिता सोयी-सुविधा निर्माण करण्यात येतील याची खातरजमा करण्यात यावी व अंतिम मान्यतेकरिता पूर्तता अहवाल सादर करतांना या संदर्भातील प्रमाणपत्र सादर करणे अनिवार्य राहील.

१०. राज्य क्रीडा व युवा धोरण २०१२ च्या अंमलबजावणी संदर्भात उच्च व तंत्र शिक्षण, शासन निर्णय दिनांक २५.०७.२०१३ मधील बाबींचे पालन करणे अनिवार्य राहील.

३. विद्यापीठाने अंतिम मान्यता देण्याबाबत आवश्यक असलेली पुढील कार्यवाही करताना संदर्भाधीन शासन निर्णयान्वये विहित कार्यपद्धती व निकषांचे पालन करावे.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०५२२१२२४१७३००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATAP PANDURANG LUBAL

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=b0d6763338fc6cc4f7cf07ca60db7abc1cfac99c84ab1b5bfc0dae4609d631d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF6895C47A84066432F5BDD1F182B4163D880AC9BD8D24A198FD0E7310BBEB59, cn=PRATAP PANDURANG LUBAL
Date: 2023.05.22 12:26:00 +05'30'

**( प्रताप पां. लुबाळ )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री, (उच्च व तंत्र शिक्षण विभाग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (उच्च व तंत्र शिक्षण विभाग), मंत्रालय, मुंबई.
५. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. कुलसचिव, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे.
७. विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, पुणे विभाग, पुणे.
८. संबंधित संस्था (विद्यापीठामार्फत)
९. निवडनस्ती (मशि-४).